**महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई अंतर्गत नोंदित बांधकाम कामगारांना लागू करण्यात आलेल्या निवृत्तीवेतन योजनेची सविस्तर कार्यपद्धती (SOP-Standard Operating Procedure) विहीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- इबांका-०३२५/प्र.क्र.४५/कामगार-७**
मंत्रालय मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १९ जून, २०२५.

**संदर्भ:-**

१. केंद्रिय श्रम व रोजगार मंत्रालयाचे पत्र क्रमांक झेड-२००१२/०९/२०१८-बी.एल., दिनांक २५ सप्टेंबर,२०१८.
२. महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई यांची बैठक क्र. ६२, दिनांक २६ मार्च, २०२५ मधील ठराव क्र.०२
३. महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई यांचे पत्र क्रमांक ६९५/२०२५/पेन्शन-२०२५/प्र.क्र.१०७/योजना-०६, दिनांक २७ मार्च,२०२५.
४. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, क्र.इबांका-०३२५/प्र.क्र.४५/ कामगार-७, दि.२८.०३.२०२५
५. महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई यांचे पत्र क्रमांक ११२६/२०२५/पेन्शन-२०२५/प्र.क्र.१०७/योजना-०६, दिनांक ०३ जून,२०२५.

**प्रस्तावना : -**

इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगार नियमन व सेवाशर्ती) अधिनियम, १९९६ च्या कलम (२२) (ब) मध्ये वयाची ६० वर्षे पुर्ण झालेल्या मंडळाकडील नोंदित बांधकाम कामगारांना निवृत्तीवेतन देण्याची तरतूद आहे. याबाबत केंद्र शासनाने विषद केलेल्या आदर्श कल्याणकारी योजनांचे  मार्गदर्शक तत्वांच्या अनुषंगाने संदर्भाधीन दिनांक २८.०३.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंडळाकडील नोंदित बांधकाम कामगारांना त्यांच्या वयाची ६० वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांना निवृत्तीवेतन लागू करण्यास मान्यता देण्यात आली आहे. उक्त शासन निर्णयातील परिच्छेद ४ (घ) मध्ये प्रस्तुत योजनेबाबत आवश्यकतेनुसार सविस्तर कार्यपद्धती निश्चित करण्याबाबत नमूद करण्यात आले होते. त्यानुषंगाने मंडळांतर्गत नोंदीत बांधकाम कामगारांना लागू करण्यात आलेल्या निवृत्तीवेतन योजनेबाबत सविस्तर कार्यपद्धती SOP (Standard Operating Procedure) विहीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई अंतर्गत नोंदित बांधकाम कामगारांनी त्यांच्या वयाची ६० वर्षे पूर्ण झाल्यानंतर लागू करण्यात आलेल्या निवृत्तीवेतन योजनच्या सविस्तर कार्यपद्धतीस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. त्यास अनुसरुन मंडळांतर्गत नोंदीत बांधकाम कामगारांना लागू करण्यात आलेल्या निवृत्तीवेतन योजनेची सविस्तर कार्यपद्धती (SOP) पुढीलप्रमाणे विहित करणेत येत आहे.

**१. निवृत्तीवेतन योजनेचे पात्रता निकष :-**

(अ) वयाची ६० वर्षे पुर्ण केलेली व मंडळाकडे सलग किमान १० वर्ष नोंदित असलेले सर्व बांधकाम कामगार सदर योजनेअंतर्गत पात्र राहतील. तसेच त्याच्या कुटुंबातील पती व पत्नी दोघेही बांधकाम कामगार असतील तर ते स्वतंत्रपणे पात्र राहतील.

(ब) पती/पत्नी च्या मृत्यूनंतर संबधित बांधकाम कामगाराचे पती/पत्नी निवृत्तीवेतनाकरिता पात्र राहतील. तथापि, पती/पत्नी सदर योजनेअंतर्गत निवृत्तीवेतन मिळत असेल तर संबधितास दुबार निवृत्तीवेतनाचा लाभ मिळणार नाही.

(क) केंद्र शासनाच्या आदर्श कल्याणकारी योजनांच्या मार्गदर्शक तत्वानुसार, कर्मचारी राज्य विमा कायदा, १९४८ (Employees State Insurance Act, १९४८) व कर्मचाऱ्यांचे प्रदाता निधी आणि विविध तरतूदी कायदा, १९५२ (The Employees Provident Fund and Miscellaneous Provision Act, १९५२) अंतर्गत लाभ प्राप्त करणारे बांधकाम कामगार निवृत्तीवेतनास पात्र राहणार नाहीत.

**२. निवृत्तीवेतनाचे निकष आणि प्रमाण/दर :-**

(अ) मंडळाकडे नोंदित पात्र बांधकाम कामगारांना त्यांच्या मंडळाकडील नोंदणीच्या कालावधीनुसार निवृत्तीवेतन अदा करण्यात येईल.

(ब) मंडळाकडे नोंदणी असलेल्या वर्षानुसार निवृत्तीवेतनाचे प्रमाण/दर खालीलप्रमाणे राहील :-

| **अ.क्र.** | **मंडळाकडे नोंदणीची एकूण वर्षे** | **दरवर्षी मिळणारे निवृत्तीवेतन** (रू.) |
|---|---|---|
| १ | १० वर्षे | ५०% (रू.६,०००/-) |
| २ | १५ वर्षे | ७५%(रू.९,०००/-) |
| ३ | २० वर्षे | १००% (रू.१२,०००/-) |

(क) मंडळाकडे जमा होणाऱ्या कामगार उपकराचा वेळोवेळी आढावा घेवून, सदर योजनेअंतर्गत देय निवृत्तीवेतनामध्ये कमी अथवा वाढ करणे, अटी व शर्तींमध्ये बदल करणे याबाबत निर्णय मंडळ मान्यतेअंती शासन स्तरावर घेतला जाईल.

**३. निवृत्तीवेतन लाभ मंजूर करण्याची कार्यपद्धती :-**

(अ) सदर योजनेअंतर्गत पात्र ठरणाऱ्या मंडळाकडे नोंदित बांधकाम कामगाराने https://mahabocw.in/ या मंडळ अधिकृत संकेतस्थळावरील विहित नमुना अर्ज विनामूल्य प्राप्त (Download) करून घ्यावा. (अर्जाचा नमूना "**प्रपत्र-अ**" प्रमाणे)

(ब) सदरचा अर्ज पूर्णपणे भरून पात्र नोंदीत बांधकाम कामगाराने त्याचे आधार कार्ड ज्या जिल्ह्यामधील आहे त्या जिल्हा बांधकाम कामगार सुविधा केंद्राचे (WFC) प्रभारी (कामगार उपायुक्त/सहायक कामगार आयुक्त/सरकारी कामगार अधिकारी) यांच्याकडे जमा करावा.

(क) निवृत्तीवेतन अर्जासोबत खालील कागदपत्रे जोडावीत :-

१. पत्त्याचा पुरावा-आधार कार्ड साक्षांकित छायाप्रत

२. जन्मतारखेचा पुरावा-जन्म दाखला/शाळा सोडल्याचा दाखला साक्षांकित छायाप्रत

३. बँक खाते पासबुक साक्षांकित छायाप्रत

(ड) संबधित प्रभारी, जिल्हा कामगार सुविधा केंद्र यांनी सदर अर्जाची छानणी करून **"निवृत्तीवेतन शिफारस प्रमाणपत्र"** (प्रपत्र-ब) सह प्रस्ताव मंडळ मुख्यालयास मान्यतेस सादर करावा. एकापेक्षा जास्त जिल्ह्यामध्ये नोंदणी/नुतनीकरणाचा कालावधी असल्यास संबधित जिह्यामधून **"वर्षनिहाय नोंदणी प्रमाणपत्र"** (प्रपत्र-क) संबधित प्रभारी, जिल्हा बांधकाम कामगार सुविधा केंद्र यांनी प्राप्त करून घ्यावे.

(ड) मंडळ स्तरावर सचिव तथा मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या मान्यतेअंती संबधित बांधकाम कामगारास **"निवृत्तीवेतन क्रमांक प्रमाणपत्र"** देण्यात येईल. (प्रपत्र-ड)

(ई) निवृत्तीवेतन क्रमांक प्रमाणपत्र दिल्याचा दिनांक हा संबधित बांधकाम कामगाराचा निवृत्तीवेतन दिनांक समजण्यात येईल व त्यानुसार वर्ष गणना करण्यात येईल.

(फ) दरवर्षी माहे नोव्हेंबर मध्ये मंडळाच्या निवृत्तीवेतनधारक बांधकाम कामगारास त्याच्या हयातीचा दाखला(प्रपत्र-इ) पुरावा स्वरूपात मंडळाकडे सादर करावा लागेल त्यासाठी त्याने आधारकार्ड/मंडळाचे नोंदणी कार्ड व निवृत्तीवेतन क्रमांक प्रमाणपत्रासह संबंधित जिल्हा कामगार सुविधा केंद्रामध्ये समक्ष उपस्थित राहून जिल्ह्याचे प्रभारी

अधिका-यांकडून हयातीचा दाखला प्राप्त करून द्यावा.जेणेकरून, त्या वर्षीचे निवृत्तीवेतन त्याच्या खात्यात जमा करता येईल.

(क) मंडळाच्या निवृत्तीवेतनधारक बांधकाम कामगारास त्याचे बँक खाते बदलावयाचे असल्यास तसा अर्ज त्यास प्रभारी, जिल्हा बांधकाम कामगार सुविधा केंद्रामार्फत मंडळास करावा लागेल.

(ख) मंडळाच्या निवृत्तीवेतनधारक बांधकाम कामगाराचा मृत्यू झाल्यास, त्याचा/ तीचा वारसदार पती/पत्नीने वारस नोंदीचा अर्ज प्रभारी, जिल्हा बांधकाम कामगार सुविधा केंद्रामार्फत मंडळास करावा लागेल.

(ग) सदर निवृत्तीवेतन क्रमांकाची नोंद एकात्मिक कल्याणकारी मंडळ संगणकीय प्रणाली (IWBMS) या प्रणालीवर घेण्यात येईल व दरमहा संबधित निवृत्तीवेतनधारक बांधकाम कामगाराच्या खात्यावर निवृत्तीवेतन जमा करण्यात येईल.

## ४. मासिक निवृत्ती वेतन प्रदानाची कार्यवाही :-

मंडळ मुख्यालयाकडून वेळोवेळी निर्गमित होणा-या **"निवृत्तीवेतन क्रमांक प्रमाणपत्रांचे आधारे"** प्रत्येक महीन्याच्या शेवटच्या आठवडयात त्यामहिन्याच्या १५ तारखेअखेर निर्गत निवृत्तीवेतन क्रमांक धारकांची मंडळ मुख्यालय स्तरावरील IWBMS प्रणालीचे व्यवस्थापक- मे.आरसीएस इन्फोटेक प्रा.लि. यांचेकडून पुढील महिन्याच्या प्रदानार्थ निवृत्तीवेतन धारकांची प्रदान फाईल (Claim disbursement File) बँकेस आवश्यक नमून्यात तयार करण्यात येईल, सदर फाईल तयार करताना त्यामध्ये निवृत्ती वेतन धारकांचे बँक तपशील, व्दिरूक्ती इ.बाबींच्या अनुषंगाने तपासणी करण्यात येईल, सदर प्रदान फाईल मंडळाच्या लेखा शाखेस सादर होईल. लेखा शाखेच्या संबंधित कार्यासनाने सदर फाईलची आवश्यक तपासणी करून सदर प्रदान फाईल सचिव तथा मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अंतिम मान्यतेस्तव सादर करावी. सदर मान्यतेअंती प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत संबधित पात्र निवृत्तीवेतन धारक बांधकाम कामगारांच्या बँक खात्यावर DBT in Cash प्रकाराने निवृत्ती वेतन जमा करण्यासाठी बँकेस पाठविण्यात यावी. लेखा शाखेने बँकेकडून वेळोवेळी यशस्वी /अयशस्वी प्रदानांचा ताळमेळ घ्यावा. अयशस्वी प्रदानाची स्वतंत्र प्रदान फाईल करण्यात यावी. व प्रत्येक महिन्याचा मासिक प्रगती अहवाल सचिव तथा मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे निदर्शनास आणून द्यावा.

## ५. मंडळ मुख्यालय स्तरावरील निवृत्तीवेतन समन्वय कक्ष :-

उपरोक्त प्रमाणे कामकाजाचे समन्वय करण्याकरिता खालीलप्रमाणे समन्वय कक्ष गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकारी | पद |
|---|---|---|
| १ | जिल्हा कार्यकारी अधिकारी | कक्ष प्रमुख |
| २ | लेखाधिकारी | समन्वयक |
| ३ | संबंधित जिल्हयाचे जिल्हा कार्यालय प्रमुख | सदस्य |
| ४ | आयडब्ल्यूबीएमएस प्रणालीचे व्यवस्थापक संस्था मे.आरसीएस इन्फोटेक लिमिटेड यांचेकडील प्रकल्प संचालक | सदस्य |

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६१९१५२७३२९०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAGUNA GANESH THENGIL

Digitally signed by SAGUNA GANESH THENGIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=d46fe3bd37ed57f0bdb52fb3a029adc135025943cb93cc90de6ceb564ced5ea3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8B4022592C04665617981351F8579C9ABD8539AE93768B3FF96B29E67B146A80, cn=SAGUNA GANESH THENGIL
Date: 2025.06.19 15:28:18 +05'30'

**(सगुणा काळे-ठेंगील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा , विधानमंडळ, मुंबई.
४. सर्व विधीमंडळ सदस्य
५. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, विधानमंडळ, मुंबई.
७. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय,मुंबई.
८. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव, मुंबई.
११. विकास आयुक्त, असंघटीत कामगार, मुंबई.
१२. कामगार आयुक्त , महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रलय, मुंबई.
१४. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१५. सचिव तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई.
१६. निवड नस्ती.

# प्रपत्र-अ

## बांधकाम कामगार निवृत्तीवेतन अर्ज

१. बांधकाम कामगाराचे नाव :-

२. बांधकाम कामगाराचा नोंदणी क्रमांक:-

३. आधार क्रमांक:-

४. जन्मदिनांक:-

५. वयाची ६० वर्षे पूर्ण झाल्याचा दिनांक:-

६. प्रथम नोंदणी झाल्याचा दिनांक:-

७. प्रथम नोंदणी झालेल्या जिल्ह्याचे ठीकाण:-

८. नोंदणी कालावधीचा तपशिल:-

| अ.क्र. | नोंदणी / नुतनीकरणाचा दिनांक | नोंदणी / नुतनीकरणाचा कालावधी | जिल्हा |
|---|---|---|---|
| १ | दि.-------- | दि. ------ ते दि. --------- | |
| २ | दि.-------- | दि. ------ ते दि. --------- | |
| ३ | दि.-------- | दि. ------ ते दि. --------- | |
| ४ | दि.-------- | दि. ------ ते दि. --------- | |
| ५ | दि.-------- | दि. ------ ते दि. --------- | |

९. बँक खात्याचा तपशिल :-

(अ) बँकेचे नाव -

(ब) खाते क्रमांक -

(क) आय.एफ.एस.सी. क्रमांक -

१०. कर्मचारी राज्य विमा कायदा, १९४८ (Employees State Insurance Act,१९४८) अंतर्गत लाभ घेण्यात येतो का ? (होय/नाही) :-

११. कर्मचा-यांचे प्रदाता निधी आणि विविध तरतूदी कायदा, १९५२ (The Employees Provident Fund and Miscellaneous Provision Act, १९५२) अंतर्गत लाभ घेण्यात येतो का ? (होय/नाही) :-

उपरोक्त प्रमाणे सादर करण्यात आलेली माहीती सत्य असून, खोटी आढळून आल्यास नियमानुसार माझ्याविरूद्धच्या उचित कारवाईस पात्र असेन याची मला जाणीव आहे.

**(बांधकाम कामगाराचे नाव)**

# प्रपत्र-ब

## -: निवृत्तीवेतन शिफारस प्रमाणपत्र :-

प्रमाणित करण्यात येते की, श्री./श्रीमती ---------------,नोंदणी क्रमांक ---------हे महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई अंतर्गत ------- वर्षे नोंदित होते. त्यांनी वयाची ६० वर्षे दिनांक ------ रोजी पूर्ण केली असून, त्यांना कर्मचारी राज्य विमा कायदा,१९४८ (Employees State Insurance Act,१९४८) व कर्मचा-यांचे प्रदाता निधी आणि विविध तरतूदी कायदा, १९५२ (The Employees Provident Fund and Miscellaneous Provision Act,१९५२) अंतर्गत लाभ प्राप्त होत नाही. निकषानुसार ते दरवर्षी रक्कम रू. ------ (--%) निवृत्तीवेतनास पात्र आहेत.

प्रभारी
(कामगार उपायुक्त/सहायक कामगार आयुक्त/
सरकारी कामगार अधिकारी)
जिल्हा इमारत कामगार सुविधा केंद्र
जिल्हा -----

# प्रपत्र-क

## -: वर्षनिहाय नोंदणी प्रमाणपत्र :-

प्रमाणित करण्यात येते की, श्री./श्रीमती ---------------, नोंदणी क्रमांक ---------हे जिल्हा इमारत कामगार सुविधा केंद्र ------ अंतर्गत दिनांक ---- ते दिनांक --- अखेर नोंदित होते.

प्रभारी
(कामगार उपायुक्त/सहायक कामगार आयुक्त/
सरकारी कामगार अधिकारी)
जिल्हा इमारत कामगार सुविधा केंद्र
जिल्हा -----

## प्रपत्र-ड

## -: निवृत्तीवेतन क्रमांक प्रमाणपत्र:-

प्रमाणित करण्यात येते की, श्री./श्रीमती ---------------,नोंदणी क्रमांक ---------हे महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई अंतर्गत ------- वर्षे नोंदित होते. त्यांनी वयाची ६० वर्षे दिनांक ------ रोजी पूर्ण केली असून, त्यांना कर्मचारी राज्य विमा कायदा,१९४८ (Employees State Insurance Act, १९४८) व कर्मचा-यांचे प्रदाता निधी आणि विविध तरतूदी कायदा, १९५२ (The Employees Provident Fund and Miscellaneous Provision Act, १९५२) अंतर्गत लाभ प्राप्त होत नाही. निकषानुसार ते दरवर्षी रक्कम रू. ------ (--%) निवृत्तीवेतनास पात्र आहेत. त्यांना दिनांक ------- पासून निवृत्तीवेतनास पात्र ठरविण्यात येत असून, त्यांता निवृत्तीवेतन क्रमांक------- हा राहील.

(लेखा अधिकारी)
महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई